न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील अधिसंख्य पदांवर वर्ग करण्यात आलेल्या सेवा व सेवा वर्ग करण्याकरीता निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदांना मुदतवाढ देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक : एफएसएल-०४२०/प्र.क्र.२७/पोल-४,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १४ फेब्रुवारी, २०२२

संदर्भ:- १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१.१२.२०१९,
२) गृह विभाग, शासन आदेश क्र.एफएसएल-०४२०/प्र.क्र.२७/पोल-४,दि.२७.०३.२०२०,
३) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२७.११.२०२०,
४) गृह विभाग, शासन निर्णय क्र.एफएसएल-०४२०/प्र.क्र.२७/पोल-४, दि.१५.१२.२०२०,
५) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२८.१०.२०२१.

शासन निर्णय:-

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.२१.१२.२०१९ व संदर्भ क्र.५ येथील दि.२८.१०.२०२१ च्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अथवा अन्य मागास प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या, जातवैधता प्रमाणपत्राबाबत न्यायालयीन प्रकरणे प्रलंबित असलेल्या अधिकारी/कर्मचारी यांना पुनर्नियुक्ती देण्यासाठी न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या आस्थापनेवरील एकूण ०५ अधिकारी/ कर्मचारी यांच्या सेवा तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरीता किंवा ते सेवेत राहीले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात आल्या होत्या.

२. उपरोक्त संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अथवा अन्य मागास प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या, जातवैधता प्रमाणपत्राबाबत न्यायालयीन प्रकरणे प्रलंबित असलेल्या अधिकारी/ कर्मचारी यांना पुनर्नियुक्ती देण्यासाठी न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई

यांच्या आस्थापनेवर एकूण ५ अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर अधिसंख्य पदावर नेमणूक देण्यात आलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांपैकी श्री.उ.शा. निनावे, प्रयोगशाळा परिचर हे दि.३०.०६.२०२० रोजी सेवानिवृत्त झाले आहेत.

**३.** न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील खालील नमूद ०४ अधिकारी/कर्मचारी यांच्या अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात आलेल्या सेवा व सेवा वर्ग करण्याकरीता निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदांचा ११ महिन्यांचा कालावधी दि.३१.१०.२०२१ रोजी संपुष्टात आल्याने, अशा सेवा वर्ग करण्यात आलेल्या अधिसंख्य पदांना व त्यावरील नियुक्त्यांना तात्पुरत्या स्वरुपात पुढील ११ महिन्यांपर्यंत किंवा असे अधिकारी/कर्मचारी सेवेत राहीले असते तर, ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते, त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यासगटाच्या शिफारसी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकारी/ कर्मचाऱ्यांची नावे | पदनाम व गट | मूळ नियुक्तीचा दिनांक | सध्या कार्यरत असलेले ठिकाण | अधिसंख्य पदावर वर्ग केल्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती मि.मि.खोपकर | सहायक रासायनिक विश्लेषक, गट-ब | १५.११.१९८९ | प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, पुणे | ३१.१२.२०१९ |
| २ | श्री.सु.दे.परचंड | वैज्ञानिक सहायक, गट-क | १७.०६.१९९१ | प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, अमरावती | ३१.१२.२०१९ |
| ३ | श्री.यु.भा.धार्मिक | सहायक अधिक्षक, गट-क | १४.०७.१९९२ | प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, नांदेड | ३१.१२.२०१९ |
| ४ | श्री.वि.शा.तरोडकर | प्रयोगशाळा परिचर गट-ड | ०१.०८.१९९२ | प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, नागपूर | ३१.१२.२०१९ |

**४.** अधिसंख्य पदाच्या वेतनावर होणारा खर्च हा संबंधित अधिकारी/कर्मचारी सध्या ज्या विभागात/ कार्यालयात कार्यरत आहेत, त्या विभागाच्या/कार्यालयाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**५.** हा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी प्रसिध्द केलेल्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२२०२१४१३२८१७६१२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

YOGESH
MAHADEO GOSAVI

Digitally signed by YOGESH MAHADEO GOSAVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=409605c5c875f777d39cbf4ca29ce3d56c5c1d7c1ea54667614a049c4798
5d83, pseudonym=62D617A4D7B024F9E251D4AEEDB670FC8D126498,
serialNumber=D910025DFF598286A45B3B22318E6C113E071B7C6E85F3D06BEC
DD5995FC1966, cn=YOGESH MAHADEO GOSAVI
Date: 2022.02.14 13:30:29 +05'30'

**( योगेश गोसावी )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), १८ वा मजला, नविन प्रशासकिय इमारत, मंत्रालय, मुंबई
२. संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
४. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रा, मुंबई
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १६-ब), मंत्रालय, मुंबई
८. संबंधित अधिकारी यांना संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्यामार्फतीने
९. निवडनस्ती/पोल-४, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई